**श्री. बी. ए. कोन्नुर, सहयोगी प्राध्यापक, स्थापत्य अभियांत्रिकी, शासकीय अभियांत्रिकी महाविद्यालय यांची बदली रद्द करणेबाबत..**

**महाराष्ट्र शासन**
**उच्च व तंत्र शिक्षण विभाग**
**शासन निर्णय क्रमांकः बदल्या-२०१५/(प्र.क्र. ६३/१५)/तांशि-१**
मंत्रालय विस्तार भवन, मुंबई ४०० ०३२
दिनांक: -१७ जून, २०१७

**<u>पहा</u> :-** शासनाचा समक्रमांकाचा दि. २७/०७/२०१५ रोजीचा शासन निर्णय..

**<u>प्रस्तावना</u> :-**

शासनाच्या संदर्भाधिन शासन निर्णयान्वये श्री. बी. ए. कोन्नुर, सहयोगी प्राध्यापक, स्थापत्य अभियांत्रिकी, शासकीय अभियांत्रिकी महाविद्याल, कराड यांची शासकीय अभियांत्रिकी महाविद्यालय, अवसरी येथे प्रशासकीय कारणास्तव बदली करण्यात आली होती.

तथापि, शासकीय अभियांत्रिकी महाविद्यालय, कराड येथे पदवी अभ्यासक्रमाचे व पदव्युत्तर अभ्यासक्रमाचे ॲक्रिडिटेशन साठी कमिटी भेट देणार होती. तसेच श्री. कोन्नुर यांच्या ऐवजी संस्थेकडे पर्यायी व्यवस्था नसल्याने संस्थेने त्यांना दि. २९/११/२०१६ पर्यंत बदलीच्या पदावर रुजू होण्यासाठी कार्यमुक्त केले नाही व दि. ३०/११/२०१६ रोजी कार्यमुक्त केले.

दरम्यानच्या काळात महाराष्ट्र लोकसेवा आयोग पुरस्कृत उमेदवार श्री. वासुदेव देवूळकर शासकीय अभियांत्रिकी व संशोधन महाविद्यालय, अवसरी येथे सहयोगी प्राध्यापक, स्थापत्य अभियांत्रिकी या पदावर नियुक्ती करण्यात आली. त्यानुसार श्री. देउळकर हे दि. २१/११/२०१६ रोजी सदर पदावर रुजू झाले होते. त्यामुळे शासकीय अभियांत्रिकी व संशोधन महाविद्यालय, अवसरी येथील सहयोगी प्राध्यापक, स्थापत्य अभि. चे पद भरले गेले. श्री. कोन्नुर हे अनुज्ञेय पदग्रहन अवधी उपभोगुन शासकीय अभियांत्रिकी व संशोधन महाविद्यालय, अवसरी येथे दि. ०९/१२/२०१६ रोजी रुजू होण्यास गेले असता संस्थेने त्यांना पद उपलब्ध नसताना रुजू करुन घेतले. सदर बाब लक्षात आल्यानंतर श्री. कोन्नुर यांना शासकीय अभियांत्रिकी महाविद्यालय, कराड येथील सहयोगी प्राध्यापक स्थापत्य अभियांत्रिकी या रिक्त पदावर रूजू होण्यासाठी प्राचार्य, शासकीय अभियांत्रिकी व संशोधन महाविद्यालय, अवसरी यांनी दि. १६/१२/२०१६ (म.न.) रोजी कार्यमुक्त केले. त्यास अनुसरुन श्री. कोन्नुर यांचा सक्तीचा खोळंबा होऊ नये तसेच विद्यार्थ्यांच्या शैक्षणिक हिताच्या दृष्टीकोनातून शासन मान्यतेच्या अधीन राहून प्राचार्य, शासकीय अभियांत्रिकी महाविद्यालय, कराड यांनी संस्थेतील रिक्त पदावर त्यांना दि. १७/१२/२०१६ (म.पू.) रोजी तात्पुरते रूजू करुन घेतले आहे. त्यानुषंगाने श्री. कोन्नुर यांची संदर्भाधिन शासन निर्णयान्वये करण्यात आलेली अवसरी येथील बदली रद्द करण्याची तसेच दि. ०१/१२/२०१६ ते दि. १६/१२/२०१६ हा कालावधी सक्तीचा खोळंबा म्हणून नियमित करण्याची बाब शासनाच्या विचाराधिन होती.

**<u>शासन निर्णय</u> :-**

श्री. बी. ए. कोन्नुर, सहयोगी प्राध्यापक, स्थापत्य अभियांत्रिकी, शासकीय अभियांत्रिकी महाविद्याल, कराड यांची शासकीय अभियांत्रिकी महाविद्यालय, अवसरी येथे शासनाच्या दि. २७/०७/२०१५ रोजीच्या संदर्भाधिन शासन निर्णयान्वये करण्यात आलेली बदली प्रशासकीय कारणास्तव या आदेशान्वये रद्द करण्यात येत आहे. तसेच त्यांचा दि. ०१/१२/२०१६ ते दि. १६/१२/२०१६ हा कालावधी महाराष्ट्र नागरी सेवा नियम,

१९८१ (सेवेच्या सर्वसाधारण शर्ती) प्रकरण-०२, नियम १ (एक) (१) अन्वये सक्तीचा खोळंबा म्हणून नियमित करण्यास मान्यता देण्यात येत आहे.

सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०१७०६१७१३०१५८९५०८ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

Sudhir Jaya Shetty

Digitally signed by Sudhir Jaya Shetty
DN: c=IN, o=Government Of Maharashtra, ou=Section Officer, postalCode=400032, st=Maharashtra, 2.5.4.20=72ea277025fdf5a4898b244953b82406eea05963bc456f1e1e8621e5917d8305, serialNumber=e9d37d499a521b728aeb3dc8ec38b759420308b9fd7816002b4af0ffbf1111d7, cn=Sudhir Jaya Shetty
Date: 2017.06.17 12:59:42 +05'30'

( सुधीर ज. शेट्टी )
कार्यासन अधिकारी, महाराष्ट्र शासन

**प्रति,**

श्री. बी. ए. कोन्नुर, सहयोगी प्राध्यापक, स्थापत्य अभियांत्रिकी, शासकीय अभियांत्रिकी महाविद्याल, कराड. (संस्था प्रमुखामार्फत)

**प्रत:**

१. मा. मंत्री, उच्च व तंत्र शिक्षण यांचे खाजगी सचिव, मंत्रालय मुंबई
२. मा. राज्यमंत्री, उच्च व तंत्र शिक्षण यांचे खाजगी सचिव, मंत्रालय मुंबई
३. संचालक, तंत्र शिक्षण संचालनालय, महाराष्ट्र राज्य, मुंबई
४. सहसंचालक, तंत्र शिक्षण, विभागीय कार्यालय पुणे.
५. प्राचार्य, शासकीय अभियांत्रिकी महाविद्याल, कराड.
६. प्राचार्य, शासकीय अभियांत्रिकी व संशोधन महाविद्याल, अवसरी.
७. महालेखापाल (लेखा व अनुज्ञेयता / लेखा परिक्षक) मुंबई, महाराष्ट्र १ .
८. जिल्हा कोषागार अधिकारी, पुणे / सातारा.
९. निवड नस्ती तांशि -१.